**<u>ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम</u>**
**योजना नुतनीकरण निधीतून (ARF) घेतलेल्या कामांच्या निधी वितरणाबाबत...**

---

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३९/पापु-०७**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २१ सप्टेंबर, २०११**

**वाचा:-** शासन निर्णय, पापुवस्ववि क्र.देप्रोअ-१३०८/प्र.क्र.८९/पापु-०७, दिनांक ३० जुलै,२००८.

**<u>प्रस्तावना</u>:-**

संदर्भाधीन शासन परिपत्रकाचे कृपया अवलोकन व्हावे. सदर परिपत्रकान्वये, योजना नुतनीकरण निधीतून घ्यावयाच्या कामांसदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. या सूचनांमधील, परिच्छेद क्र. ५ अन्वये, योजनांच्या दुरुस्तीच्या कामांना जिल्हा जलव्यवस्थापन समितीने मान्यता दिल्यानंतर, पहिला हप्ता म्हणून दुरुस्ती खर्चाच्या ४५ टक्के रक्कम ग्राम पंचायतीस तातडीने उपलब्ध करून द्यावी, दुसरा हप्ता अदा करण्यापुर्वीग्रामपंचायतीने अटी व शर्तीची पुर्तता केली आहे, याची खातरजमा करण्यात यावी. असे नमूद करण्यात आलेले आहे. मात्र, दुसरा हप्ता किती टक्के रकमेचा द्यावा यासंदर्भात पुरेशी स्पष्टता नसल्याने, जिल्हा परिषदेच्या ग्रामीण पाणी पुरवठा विभागांकडून यासंदर्भात सुस्पष्ट सूचना देण्यासंदर्भात विनंती करण्यात आलेली आहे.

त्यानुसार, योजना नुतनीकरण निधीतून केलेल्या कामांच्या निधी वितरणासंदर्भात सुस्पष्ट सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन परिपत्रक :</u>**

संदर्भाधीन दि.३० जुलै,२००८ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या दुरुस्तीच्या कामांना जिल्हा जलव्यवस्थापन समितीने सहमती दिल्यानंतर, संबंधित ग्रामपंचायतीने लोकसहभागापैकी ५ टक्के रक्कम तात्काळ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीच्या खात्यात वर्ग करावी, त्यानंतर पहिला हप्ता म्हणून ४५ टक्के निधी जिल्हा परिषदेने समितीच्या खात्यात वर्ग करावा. ग्रामपंचायतीने उर्वरित ५ टक्के लोकसहभाग समितीच्या खात्यावर जमा केल्यावर, उर्वरित ४५ टक्के निधी जिल्हा परिषदेने तातडीने समितीला वर्ग करावा.

२.	सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९२११५३६०३००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/
**(र.अ.खडसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,
मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव
सर्व विधान सभा/ विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य
विभागीय आयुक्त (सर्व)
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा परीक्षा/लेखा  व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर
सर्व प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
मंत्रालयातील इतर सर्व विभाग,
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
निवडनस्ती, कार्यासन क्रमांक पापु-०७